**क्षमताबांधणी व पूर्वतयारीसाठी प्राप्त होणाऱ्या निधीतून राज्यातील उर्वरित १६ जिल्ह्यात "आपदा मित्र" प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन प्रभाग)**

**शासन निर्णय क्रमांक- आमिप्र-२०२४/प्र.क्र.२३/मंनिक-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०००३२

दिनांक:- ०९ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ**

१. दिनांक 26 एप्रिल, 2024 रोजीच्या तांत्रिक मूल्यमापन समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२. दिनांक 21 मे, 20241 रोजीच्या अंदाजपत्रकीय मूल्यनिर्धारण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३. दिनांक ४ जुलै, २०२४ रोजीच्या राज्य कार्यकारी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (NDMA) यांच्या संकल्पनेतून संपूर्ण देशभरात "आपदा मित्र" ही योजना राबवण्यात येत आहे. आपत्ती दरम्यान "प्रथम प्रतिसादकर्ता" हा नेहमी स्थानिक रहिवासी असतो. यास्तव स्थानिक स्तरावर उद्भवणाऱ्या आपत्तींना तात्काळ प्रतिसाद देण्याकरीता स्थानिक लोकांना आपत्ती व्यवस्थापन विषयक प्रशिक्षण देऊन सक्षम करणे हे या योजनेचे मूळ उदिष्ट आहे. या योजनेच्या माध्यमातून जीवित हानी कमी करणे, समाजात आपत्ती व्यवस्थापन विषयक जनजागृती करणे व आपत्तीला प्राथमिक स्तरावर प्रतिसाद देण्याकरीता मनुष्यबळ तयार करणे अशा अनेक बाबी साध्य होणार आहेत.

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्यामार्फत "**Up Scaling Aapada Mitra**" या योजनेअंतर्गत "आपदा मित्र" या योजनेची व्याप्ती वाढवण्याचा निर्णय घेण्यात आला. या योजनेत **महाराष्ट्र राज्यातील २० जिल्ह्यांचा** समावेश करण्यात आला असून **एकूण ७९०० आपदा मित्र** प्रशिक्षित करण्याचे उद्दिष्ट ठेवण्यात आले होते. सदर उदिष्ट माहे एप्रिल, २०२३ रोजी पूर्ण करण्यात आले.

राज्यातील २० जिल्ह्यात राबविण्यात आलेल्या "Up Scaling Aapada Mitra" या योजनेचे यश, आपत्ती व्यवस्थापनाबाबत समाजात झालेली जनजागृती, ग्रामीण स्तरावर कार्यरत आपदा मित्रांमुळे शासनास होणारी मदत, नागरिकांना आपदा मित्रांमुळे तातडीने होणारी मदत इत्यादी सर्व बाबींचा विचार करता **राज्यातील उर्वरित १६ जिल्ह्यात** राज्य शासनामार्फत "आपदा मित्र प्रशिक्षण कार्यक्रम" राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय**

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (NDMA) यांच्यामार्फत राज्यातील 20 जिल्ह्यात "**Up Scaling Aapada Mitra**" या योजनेअंतर्गत राबविण्यात आलेल्या "आपदा मित्र" योजनेचे यश पाहता राज्यातील खालील तक्त्यातील उर्वरित 16 जिल्ह्यांत राज्य शासनामार्फत "आपदा मित्र प्रशिक्षण कार्यक्रम" राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | आपदा मित्र संख्या | अ.क्र. | जिल्हा | आपदा मित्र संख्या | अ.क्र. | जिल्हा | आपदा मित्र संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पालघर | ५०० | ७ | बीड | ३०० | १३ | वाशिम | ३०० |
| २ | कोल्हापूर | ५०० | ८ | लातूर | ३०० | १४ | यवतमाळ | ३०० |
| ३ | छत्रपती संभाजीनगर | ५०० | ९ | हिंगोली | ३०० | १५ | वर्धा | ३०० |
| ४ | सोलापूर | ३०० | १० | धाराशीव | ३०० | १६ | गोंदिया | ३०० |
| ५ | धुळे | ३०० | ११ | बुलढाणा | ३०० | **एकूण** | | **५४००** |
| ६ | जालना | ३०० | १२ | अकोला | ३०० | | | |

०२. राज्य शासनामार्फत राज्यातील १६ जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येणाऱ्या आपदा मित्र प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या जिल्ह्यानिहाय संख्येनुसार एकूण ५४०० आपदा मित्रांना शासनाकडून निवड करण्यात येणाऱ्या यंत्रणेमार्फत आपत्ती व्यवस्थापन विषयाबाबत १२ दिवसाचे निवासी प्रशिक्षण देण्यात येईल. सदर प्रशिक्षणाकरीता वय वर्षे १८ ते ४५ या गटातील शारिरिक व मानसिकदृष्ट्या सक्षम असलेल्या सामान्य नागरिक, महाविद्यालयीन विद्यार्थी, अशासकीय संघटना (NGO), आशा वर्कर्स, अंगणवाडी सेविका, शासकीय व निमशासकीय कर्मचारी इत्यादी यांचा समावेश करण्यात यावा. तथापि, डॉक्टर, माजी सैनिक, स्थापत्य अभियंता यांच्या करीता वयोमर्यादा ही ५५ वर्षापर्यंत राहील मात्र त्यांना अपघात विमा विषयक सुविधा अनुज्ञेय राहणार नाही. संबंधीत जिल्हा आपत्ती व्यस्थापन प्राधिकरण यांनी उपरोक्त तक्त्यात नमूद जिल्हानिहाय निश्चित करण्यात आलेल्या मर्यादेत आपदा मित्र प्रशिक्षण कार्यक्रमांकरीता नोंदणी करावी. सदर नोंदणी करतांना इच्छुक महिलांचा समावेश करण्यात यावा. तसेच प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण झाल्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्या मान्यतेने शासनास सादर करावा.

०३. या प्रशिक्षण कार्यक्रमात सहभाग नोंदविण्याऱ्या आपदा मित्रांना विहित करण्यात आलेले १२ दिवसांचे प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर शासनाकडून पुढील ३ वर्षाकरीता आपत्तीसमयी शोध व बचाव कार्य करतांना अपघात झाल्यास रु.५.०० लक्ष मर्यादेत अपघात विमा तसेच वैयक्तिक आपत्कालीन प्रतिसादकर्ता संच (ERK-Emergency Responder Kit) पुरविण्यात येईल.

०५. या प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत समाविष्ट करण्यात आलेल्या उपरोक्त तक्त्यामधील १६ जिल्ह्यांना प्रत्येकी १ यानुसार आपत्कालीन अत्यावश्यक राखीव संसाधने संच (EERR-Emergency Essential Reserve Resource) शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येईल.

०६. राज्यातील १६ जिल्ह्यांत आपदा मित्र प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता येणाऱ्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र | तपशील | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | **प्रशिक्षण खर्च**<br>रू. १५७५/- प्रतिव्यक्ती X १२ दिवस X ५४०० आपदा मित्र | १०,२०,६०,०००/- |
| २ | **ERK KIT** (आपत्कालीन प्रतिसादकर्ता संच - प्रती व्यक्ती)<br>प्रत्येकी १२,०९९/- रुपये व विमा X ५४०० आपदा मित्र ) | ६,५३,३४,६००/- |
| ३ | **EERR KIT** (आपत्कालीन अत्यावश्यक राखीव संसाधने - प्रती जिल्हा)<br>२२,३२,०३८/- रुपये व साहित्य दुरुस्ती व देखभाल खर्च X १६ जिल्हे | ३,५७,१२,६०८/- |
| **एकूण २०,३१,०७,२०८/- ( रुपये वीस कोटी एकतीस लक्ष सात हजार दोनशे आठ फक्त )** | | |

०७. या बाबीवर होणारा अंदाजित खर्च मागणी क्रमांक सी - ६, प्रधानशीर्ष, (२२४५) (९१) - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) पूर्व तयारी व क्षमता बांधणी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५ ४१८८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९५/२०२४/व्यय-९, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८०९१९३२४७०९१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.08.09 19:51:04 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री गृह यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री वित्त यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई
८. विभागीय आयुक्त सर्व
९. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, सर्व जिल्हे
१०. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
११. महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१३. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.कार्यासन व्यय-9 वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (मंनिक-२/आव्यप्र-१)